सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील "कक्ष अधिकारी" संवर्गातील १ पद "अवर सचिव" या संवर्गात श्रेणीवर्धित करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आढावा-१८२३/प्र.क्र.१८/१९अ

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : १० मार्च, २०२३

**वाचा :**

शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-असप-१२२२/प्र.क्र.११०/का-१४, दिनांक २३ फेब्रुवारी २०२३

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागात कक्ष अधिकारी पदावर कार्यरत असलेले श्री.उदय नारायण सार्दळ यांना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१, दिनांक २३ फेब्रुवारी २०२३ च्या शासन आदेशान्वये अवर सचिव पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येऊन, त्यांची पदस्थापना याच विभागात करण्यात आली आहे. ते दिनांक २४ फेब्रवारी २०२३ (म.पू.) पासून विभागात रुजू झाले आहेत. ते दिनांक ३१ मार्च २०२३ रोजी सेवानिवृत्त होणार आहेत.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-आढावा-१६१६/प्र.क्र.२१३/१९अ, दिनांक १७ जानेवारी २०२३ अन्वये सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील ७५३ पदांचा सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. या विभागासाठी अवर सचिव संवर्गात ३८ पदे मंजूर असून सर्व पदे भरलेली आहेत. कक्ष अधिकारी संवर्गात ९३ मंजूर पदांपैकी २० पदे रिक्त आहेत. सध्या श्री.सार्दळ यांना अवर सचिव पदावर पदस्थापना देण्यासाठी विभागातील कक्ष अधिकाऱ्याचे एक पद अवर सचिव संवर्गात श्रेणी उन्नत करणे आवश्यक आहे. सबब विभागातील कक्ष अधिकाऱ्याचे एक पद अवर सचिव संवर्गात श्रेणीवर्धित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील कक्ष अधिकारी संवर्गातील (वेतन स्तर एस-१७ : रु.४७,६००-१,५१,१००) १ पद अवर सचिव संवर्गात (वेतन स्तर एस-२३ : रु.६७,७००-२,०८,७००) दिनांक २४ फेब्रुवारी २०२३ (म.पू.) पासून श्रेणीवर्धित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या श्रेणीवर्धित पदावर श्री.उदय नारायण सार्दळ, अवर सचिव यांना दिनांक २४ फेब्रुवारी, २०२३ (म.पू.) पासून पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. हे श्रेणीवर्धित पद, ते विभागातील अवर सचिव पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहिल. त्यानंतर हे पद आपोआप कक्ष अधिकारी पदावर श्रेणी अवनत होईल.

३. याबाबत होणारा खर्च सामान्य प्रशासन विभागाच्या योग्य त्या अर्थसंकल्पिय लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-७७/२०२३/सेवा-९, दिनांक ८ मार्च, २०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१०११४४१०१९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK PANDURANG LANJEKAR

Digitally signed by DEEPAK PANDURANG LANJEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=50aee5be80b8f41754378fd9d8a0a12c0a445a745e540a405b3cdd04cebdde40, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BCC288AF57C36E3D108E6290737D2413F2FCF284C5FF204A8683A0128208DE77, cn=DEEPAK PANDURANG LANJEKAR
Date: 2023.03.10 11:52:35 +05'30'

**( दी. पां. लांजेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. श्री.उदय नारायण सार्दळ, अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (२६-रोख शाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (कार्यासन : सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (कार्यासन-१९ आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वैयक्तिक नस्ती / कार्यासन-१९.
१२. निवड नस्ती / कार्यासन-१९अ.